**श्री. नितीन रमेश उपरेलू, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित), सहायक संचालक, नगर रचना, यवतमाळ शाखा, यवतमाळ यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या आस्थापेनवर "सहायक कार्यकारी अभियंता" पदावर रुजू होण्याकरिता कार्यमुक्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.राजीना-५९१७/४५९/प्र.क्र.७४/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- ११ एप्रिल, २०१७.**

वाचा :- १. श्री. नितीन रमेश उपरेलू, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित), यवतमाळ शाखा, यवतमाळ यांचा अर्ज, दि.२३.०३.२०१७.

२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव क्र.आस्था/निरउ/सनर/राजीनामा/प्रशा-१ब/१८०८, दि.०५.०४.२०१७.

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७.

**प्रस्तावना :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील श्री. नितीन रमेश उपरेलू, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित), सहायक संचालक, नगर रचना, यवतमाळ शाखा, यवतमाळ यांची महाराष्ट्र अभियांत्रिकी (स्थापत्य) सेवा परीक्षा-२०१३ अन्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातंर्गत "सहायक कार्यकारी अभियंता / सहायक अभियंता, श्रेणी-१" गट-अ पदावरील नियुक्तीकरिता महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून शिफारस करण्यात आली आहे. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी आदेश क्र.मजीप्रा/मलोआ/सकाअ/नियुक्ती/२००८/आ-१, दि.२८.०२.२०१७ अन्वये श्री. नि. र. उपरेलू, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित) यांची "सहायक कार्यकारी अभियंता" पदावर दोन वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीकरिता नियुक्ती केली आहे.

**०२.** उपरोक्त शिफारशीच्या अनुषंगाने श्री. नि. र. उपरेलू, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित) यांनी त्यांच्या **संदर्भ-१** येथील दि.२३.०३.२०१७ रोजीच्या पत्रान्वये त्यांना नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरुन कार्यमुक्त करण्याबाबत विनंती केलेली आहे. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपरोक्त दि.०५.०४.२०१७ रोजीच्या पत्रान्वये श्री. नि. र. उपरेलू, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित) यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता संचालनालयाच्या सेवेतून कार्यमुक्त करण्याची शिफारस केली असून, सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. नितीन रमेश उपरेलू, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित) यांच्या कार्यमुक्ततेपूर्वी या विभागांतर्गत त्यांच्याविरुद्ध कोणतीही विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नसल्याचे संचालक, नगर रचना, पुणे यांनी प्रमाणित केले असल्याने श्री. नि. र. उपरेलू, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित), सहायक संचालक, नगर रचना, यवतमाळ शाखा, यवतमाळ यांना महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातंर्गत महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या आस्थापनेवर "सहायक कार्यकारी अभियंता (स्थापत्य) (गट-अ)" पदावर रुजू होण्याकरिता नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील "सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब / राजपत्रित)" पदावरुन दि.११.०४.२०१७ (म.नं.) पासून खालील अटीच्या अधीन राहून कार्यमुक्त करण्यात येत आहे.

श्री. नि. र. उपरेलू, सहाय्यक नगर रचनाकार यांचेकडून शासनास येणे असलेल्या सण अग्रिमाची रु.६,०००/- (अक्षरी रुपये सहा हजार फक्त) इतकी रक्कम संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याने त्यांना देय असलेल्या मार्च, २०१७ च्या वेतनातून एकरकमी वसूल करावेत अथवा श्री. उपरेलू यांनी कार्यमुक्ततेपूर्वी उक्त रक्कम रोखीने शासकीय कोषागारात भरावेत.

०२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७ मधील परिच्छेद-२ (ब) (१) व (२) (एक) मधील तरतुदीनुसार सदरचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक **२०१७०४१११११५२१३६९२५** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2f7e29994246b598ed0f72234360bb639afd8fae26e0e7238d80dcb921ce52a, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2017.04.13 13:12:39 +05'30'

**( ए. कि. सहाणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, नवीन मंत्रालय, गो. ते. रुग्णालय आवार, मुंबई.
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, चौथा मजला, एक्सप्रेस टॉवर्स, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१.

६. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(३-प्रती)**

७. सह संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती.

८. अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, नवीन मंत्रालय, गो. ते. रुग्णालय आवार, मुंबई.

९. सहायक संचालक, नगर रचना, यवतमाळ शाखा, यवतमाळ.

१०. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,.

११. श्री. नितीन रमेश उपरेलू, सहाय्यक नगर रचनाकार, श्रेणी-१ (गट-ब/राजपत्रित), सहायक संचालक, नगर रचना, यवतमाळ शाखा, यवतमाळ यांना **(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत)**

१२. निवडनस्ती / नवि-२७.

*****